विभागांतर्गत स्थापित महामंडळे/ उपकंपन्यांना मनुष्यबळ व मुलभूत सोयी-सुविधा इ. उपलब्ध करून देण्याकरीता समिती गठीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : महामं-२०२५/प्र.क्र.२३/महामंडळे**

मोती महल, खोली क्र.२, २ रा मजला,

१९५ जे.टाटा मार्ग, चर्चगेट, मुंबई ४०० ०२०.

दिनांक : २१ मार्च, २०२५.

**शासन निर्णय :-**

इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या अधिनस्त महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या. व वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या. ही दोन मुख्य महामंडळे कार्यान्वित असून त्याअंतर्गत राज्यातील विविध समाज घटकांसाठी एकूण २० उपकंपन्या नव्याने स्थापन झाल्या आहेत. सदर महामंडळे तसेच उपकंपन्या यांच्या मुख्यालय, प्रादेशिक कार्यालय व जिल्हा स्तरावरील कार्यालयांसाठी मनुष्यबळ, आवश्यक सोयी-सुविधा इ. उपलब्ध करून देणे आवश्यक असल्याने इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | पदनाम | समितीतील स्थान |
|---|---|---|
| १. | संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे | अध्यक्ष |
| २. | सह सचिव / उप सचिव (महामंडळे), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ३. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या., मुंबई. | सदस्य |
| ४. | व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या., मुंबई. | सदस्य |
| ५. | कक्ष अधिकारी (महामंडळे), इतर मागास बहुजन कल्याण विभाग,मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

२. सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल :-

**(एक)** विभागाच्या अधिनस्त महामंडळे तसेच, उपकंपन्या यांच्या मुख्यालय, प्रादेशिक व जिल्हा स्तरावरील कार्यालयांसाठी मनुष्यबळ प्रस्तावित करणे.

**(दोन)** महामंडळे तसेच, उपकंपन्या यांचेसाठी आवश्यक सोयी सुविधा पुरविणे.

**(तीन)** इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या सहायक संचालक, प्रादेशिक उपसंचालक यांचेशी महामंडळांच्या कामकाजाबाबत योग्य समन्वय साधणे व याबाबत शिफारस करणे.

**(चार)** महामंडळे, उपकंपन्या यांच्या कामकाजात सुसूत्रता आणणे व योजनांची प्रभावी अंमलबजावणी करणे.

३. सदर समितीने त्यांचा अहवाल १ महिन्याच्या आत विभागास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०३२११६२९२५१३३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by RAVINDRA RAMDAS PETKAR
Date: 2025.03.21 16:30:15 +05'30'

**(र. रा. पेटकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व सह सचिव/उप सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या., मुंबई.
६. व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या., मुंबई.
७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (महामंडळे).